रेशीम संचालनालय, नागपूर यांच्या आस्थापनेवरील पदांचा आकृतीबंध निश्चित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: आस्था-१९१६/प्र.क्र.३८/रेशीम कक्ष**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक ०९ मार्च, २०२२

वाचा :-

१) शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्र.सीएसबी-१०९४/[६१५३]/उद्योग-५, दिनांक २७ ऑगस्ट, १९९७.

२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. रेशीम-१३०८/प्र.क्र.३३/रेशीम कक्ष, दिनांक २२ मार्च, २०११.

३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. रेशीम-१३११/प्र.क्र.२१७/रेशीम कक्ष, दिनांक २२ मार्च, २०१२.

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१, दिनांक ११ फेब्रुवारी, २०१६.

५) नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जिवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तांवाची सखोल तपासणी करण्यासाठी स्थापन केलेल्या उच्चस्तरीय सचिव समितीची दि.२६ नोव्हेंबर, २०२१ रोजी झालेल्या सन २०२१ मधील ९ व्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना:-

रेशीम उद्योगाची झालेली व होणारी वाढ लक्षात घेऊन रेशीम उद्योगाचा अधिक कार्यक्षम व समन्वित विकास करण्याच्या दृष्टीने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २७ ऑगस्ट, १९९७ च्या शासन निर्णयान्वये वस्त्रोद्योग विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली स्वतंत्र रेशीम संचालनालयाची स्थापना दिनांक ०१ सप्टेंबर, १९९७ रोजी नागपूर येथे करण्यात आली आहे. रेशीम संचालनालयाच्या स्थापनेच्या वेळी रेशीम उद्योगाच्या विकासासाठी विविध आस्थापनांवर वेळोवेळी निर्माण करण्यात आलेली ५०४ पदे उक्त शासन निर्णयातील तरतूदीनुसार रेशीम संचालनालयाकडे वर्ग करण्यात आली होती.

रेशीम संचालनालय, नागपूर अंतर्गत पदांचा आढावा घेऊन संदर्भाधीन दिनांक २२ मार्च, २०११ च्या शासन निर्णयान्वये रेशीम संचालनालयाकरिता ३७३ पदांचा सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्यात आला. तद्नंतर उच्चस्तरीय सचिव समितीच्या मान्यतेनंतर संदर्भाधीन दिनांक २२ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयाद्वारे जव्हार, जि. ठाणे येथे नवीन जिल्हा रेशीम कार्यालय निर्मितीसह सदर कार्यालयासाठी ६ नवीन पदे मंजुर करण्यात आली आहेत. त्यानुसार रेशीम संचालनालय, नागपूर अंतर्गत एकूण ३७९ पदे मंजुर आहेत.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ११ फेब्रुवारी, २०१६ च्या शासन निर्णयानुसार सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेऊन सुधारीत आकृतीबंध निश्चित करणे अनिवार्य करण्यात आले आहे. त्याअनुषंगाने नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जिवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तांवाची सखोल तपासणी करण्यासाठी मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली गठीत उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२६ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या बैठकीत रेशीम संचालनालयासाठी ३७९ पदांचा आकृतीबंधाचा प्रस्ताव विभागाने सादर केला होता. त्यास अनुसरुन ३११ नियमित पदे व ५४ बाह्यस्रोताद्वारे घ्यावयाच्या सेवा असा आकृतीबंधाचा प्रस्ताव उच्चस्तरीय सचिव समितीने मंजूर केला आहे. त्यानुसार रेशीम संचालनालय, नागपूर यांच्या आस्थापनेवरील पदांचा आकृतीबंध निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नवीन पदनिर्मिती, पदांचे पुनरुज्जिवन व पदांचे आढावे इत्यादी प्रस्तांवाची सखोल तपासणी करण्यासाठी मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली गठीत उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.२६ नोव्हेंबर, २०२१ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार रेशीम संचालनालय, नागपूर यांच्या आस्थापनेवरील पदांचा खालील तक्त्यांमध्ये दर्शविल्याप्रमाणे ३११ नियमित पदे व ५४ बाह्यस्रोताद्वारे घ्यावयाच्या सेवा असा आकृतीबंधाचा प्रस्ताव याद्वारे निश्चित करण्यात येत आहे:-

**अ) नियमित पदे**

| अ. क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | मंजूर पदे | विभागाचा प्रस्ताव | उच्चस्तरीय सचिव समितीची मंजुरी |
|---|---|---|---|---|---|
| १ | संचालक | S-२५ : ७८८००-२०९२०० | १ | १ | १ |
| २ | उपसंचालक | S-२० : ५६१००-१७७५०० | २ | २ | २ |
| ३ | सहायक संचालक | S-१६ : ४४९००-१४२४०० | ४ | ४ | ४ |
| ४ | रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-१ | S-१५ : ४१८००-१३२३०० | १२ | १२ | १२ |
| ५ | रेशीम विकास अधिकारी, श्रेणी-२ | S-१४ : ३८६००-१२२८०० | २१ | २१ | २१ |
| ६ | वरिष्ठ तांत्रिक सहायक | S-१० : २९२००-९२३०० | ५५ | ५५ | ५५ |
| ७ | वरिष्ठ क्षेत्र नि प्रयोगशाळा सहायक | S-८ : २५५००-८११०० | ३१ | ३१ | ३१ |
| ८ | प्रयोग निर्देशक | S-७ : २१७००-६९१०० | १४ | १४ | १४ |
| ९ | क्षेत्र सहायक | S-६ : १९९००-६३२०० | ११४ | ११४ | ११४ |
| १० | मेकॅनिक | S-६ : १९९००-६३२०० | १ | १ | १ |
| ११ | इलेक्ट्रिशन/वीजतंत्री | S-६ : १९९००-६३२०० | १ | १ | १ |
| १२ | रेअरिंग ऑपरेटिव्ह | S-५ : १८०००-५६९०० | ६ | ६ | ६ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १३ | प्रयोगशाळा परिचर/रेअरर्स | S-१ : १५०००-४७६०० | १० | १० | १० |
| १४ | लेखाधिकारी | S-१६ : ४४९००-१४२४०० | १ | १ | १ |
| १५ | वरिष्ठ अधीक्षक | S-१४ : ३८६००-१२२८०० | २ | २ | २ |
| १६ | अधीक्षक | S-१३ : ३५४००-११२४०० | ३ | ३ | ३ |
| १७ | वरिष्ठ सहायक | S-८ : २५५००-८११०० | १६ | १६ | १६ |
| १८ | लिपिक टंकलेखक | S-६ : १९९००-६३२०० | १७ | १७ | १७ |
| १९ | वाहन चालक | S-६ : १९९००-६३२०० | १२ | १२ | **० मृत संवर्ग** |
| २० | शिपाई | S-१ : १५०००-४७६०० | ५६ | ५६ | **० मृत संवर्ग** |
| | | **एकूण नियमित पदे** | **३७९** | **३७९** | **३११** |

**ब) बाह्ययंत्रणेद्वारे घ्यावयाच्या सेवा**

| **अ.क्र.** | **सेवा** | **मनुष्यबळ संख्या** |
|---|---|---|
| १ | वाहन चालक | १२ |
| २ | शिपाई | ४२ |
| | **एकूण** | **५४** |

**२.** वरील तक्ता अ) येथील जे संवर्ग मृत ठरविण्यात आले आहेत, त्या संवर्गात जितके कर्मचारी कार्यरत असतील तितकी पदे अधिसंख्य गणण्यात यावीत. सदर अधिसंख्य पद त्यावर कार्यरत व्यक्तीच्या सेवानिवृत्ती/राजीनामा/मृत्यु इ. कारणामुळे रिक्त झाल्यानंतर ते पद आपोआप रद्द होईल. तसेच, मृत संवर्गात तक्ता ब) मध्ये दर्शविलेल्या मनुष्यबळ संख्येच्या मर्यादेत सेवा आवश्यकतेनुसार बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्यात आली आहे. तथापि, उक्त संवर्गात सध्या अधिसंख्य म्हणून कार्यरत असलेली पदे वगळून उर्वरित मनुष्यबळ संख्येच्या प्रमाणात सेवा बाह्ययंत्रणेकडून घेण्यात याव्यात. अधिसंख्य ठरविलेल्या पदावरील व्यक्तीच्या सेवानिवृत्ती/ राजीनामा/मृत्यु इ. कारणामुळे रिक्त झालेले अधिसंख्य पद आपोआप रद्द होईल. तद्नंतर त्या सेवा आवश्यकतेनुसार बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यात येतील.

**३.** वरील तक्ता ब) येथील सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेताना, वित्त विभागाच्या दि.२७.०९.२०१०, दि.०२.०२.२०१३, दि.०२.१२.२०१३, दि.०२.०८.२०१६ व दि.३०.०९.२०२० च्या शासन परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांचे पालन करण्याची दक्षता संचालक (रेशीम) यांनी घ्यावी. तसेच, संवर्ग निहाय सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्याऐवजी संवर्गाचे एकत्रिकरण करुन (Multitasking करणारा कर्मचारीवृंद) बहुउद्देशिक स्वरुपाच्या सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यात याव्यात.

**४.** उच्चस्तरीय सचिव समितीने मान्य केल्याप्रमाणे पदे मंजूर करण्यात येत असल्यामुळे अतिरिक्त ठरणारी पदे याद्वारे रद्द करण्यात येत आहेत.

**५.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१ अन्वये पदभरतीवर निर्बंध घातले असून सदर सूचना कायम राहतील. सदर निर्बंध जोपर्यंत उठत

नाहीत तोपर्यंत वरील मान्यतेनुसार नवीन भरती करता येणार नाही. अत्यंत तातडीच्या परिस्थितीत वित्त विभागाची मान्यता आवश्यकता राहील. तथापि, शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ३० जुलै, २०२१ अन्वये दिलेल्या सूचनेनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील रिक्त पदे भरण्याची प्रक्रिया तातडीने सुरु करावी.

६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.७४/आपुक, दि.०९.०२.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३०९११४३०३११०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KISHOR DAULAT PATIL

Digitally signed by KISHOR DAULAT PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=800eadd0439866ccccf42ae63d94e1c7678124d2496cc90252be5707ed3de3f3,
pseudonym=EC7EBA9942E9F48AE6C4CC1914098CEDF969D21E,
serialNumber=4ACEBAE058F9790422D1385B04BAA7B606C3951CA0FDE91204ACE3BB2EE4B2C5, cn=KISHOR DAULAT PATIL
Date: 2022.03.09 11:45:12 +05'30'

**( कि.दौ. पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सर्व मा. मंत्री/मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६) सर्व मा. संसद सदस्य/विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) वित्त विभाग (कार्यासन-विसु-१/आपुक/अर्थ-३/व्यय-२), मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१०) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
११) संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
१३) सर्व प्रादेशिक रेशीम कार्यालये.
१४) सर्व जिल्हा रेशीम कार्यालये.
१५) निवड नस्ती/रेशीम कक्ष.